“सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.११/शिक्षण-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दि. ११.१०.२०१८
२.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.२८/ शिक्षण-२, दि. ३०.०८.२०२३
३.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.५७/ शिक्षण-२, दि.८.११.२०२३
४. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२४/प्र.क्र.११/ शिक्षण-२, दि.१२.१२.२०२४ व दि.२०.०१.२०२५
५.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.२४.०३.२०२५ रोजी चे पत्र.
६. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.२७.०३.२०२५ रोजी चे पत्र.

**प्रस्तावना:-**

विजाभज इमाव व विमाप्र प्रवर्गातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र.१ दिनांक ११.१०.२०१८ च्या तरतूदीनुसार सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाकरिता शासन निर्णय, संदर्भ क्र.२ दिनांक ३०.०८.२०२३ अन्वये ५० विद्यार्थ्यांची अंतिम निवड करण्यात आली आहे.

उक्तप्रमाणे प्रस्तावित केल्यानुसार सन २०२३-२४ करिता परेदश शिष्यवृत्ती योजनेंतर्गत अंतिम निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी नाशिक विभागातील एकूण ०१ विद्यार्थ्यासाठी एकूण रु.१९,६७,४६१/- (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष सदुसष्ट हजार चारशे एकसष्ट फक्त) इतकी शिष्यवृत्ती मिळणेबाबत संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये मागणी केली आहे. सबब प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार नाशिक विभागातील एकूण ०१ विद्यार्थ्यांसाठी रक्कम रु.१९,६७,४६१/- (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष सदुसष्ट हजार चारशे एकसष्ट फक्त) इतका शिष्यवृत्ती निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ करिता परदेश शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत अंतिम निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी नाशिक विभागातील एकूण ०१ विद्यार्थ्यांसाठी रक्कम रु.१९,६७,४६१/- (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष सदुसष्ट हजार चारशे एकसष्ट फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विद्यार्थ्याचे नाव | अभ्यासक्रम कालावधी | चलन | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | सुजीत निर्मल जावळे | २ वर्ष | १ USD $= ८६.३३ | USD $ १०१७२ रु.८,७८,१४९/- (द्वितीय वर्ष द्वितीय सत्र) | USD $ ७७००+ USD $ ३०२६ प्रथम वर्ष उर्वरित रक्कम रू. ९,२५,९७६/- (द्वितीय वर्ष द्वितीय सत्र) | USD $ १८९२ रु.१,६३,३३६/- ( द्वितीय वर्ष द्वितीय सत्र ) | ----- | **रु.१९,६७,४६१/- ( द्वितीय वर्ष द्वितीय सत्र )** |
| एकूण (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष सदुसष्ट हजार चारशे एकसष्ट फक्त) | | | | | | | | रु.१९,६७,४६१/- |

२. उपरोक्तप्रमाणे निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे यांच्या संदर्भीय पत्र क्र. ०६ च्या अनुषंगाने कळविण्यात आल्यानुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे यांचे कार्यालयाकडील अखर्चित निधीतून सदर खर्च भागविण्यात यावा.

३. उपरोक्त निधी सदर विद्यार्थ्यास वितरीत करत असताना विद्यार्थ्यांनी सादर केलेल्या निधी मागणीचा प्रस्ताव तपासून, विद्यापिठाची कागदपत्र पडताळणी करुन, सदर निधी ज्या विद्यार्थ्याकरिता मंजूर करण्यात आलेला आहे त्याच विद्यार्थ्याकरिता खर्ची पडेल तसेच, परदेशी शिष्यवृत्ती अंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र. १ दि. ११.१०.२०१८ व शासन शुद्धिपत्रक दि. २४.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३ मधील अटी व शर्तीची पुर्तता करुन संबंधित विद्यार्थ्यांचे निधी मागणीचे प्रस्ताव तपासून निधी मंजूर करण्याबाबतची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. सदर निधी खर्च करतांना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तींचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडजी-०३ (०२) (१८) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (२२२५ एफ २१८)" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२८१६१५४६६८३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2025.03.28 16:16:42 +05'30'

**(नि.लो.वारुळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६. प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नाशिक.
७. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
८. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती (शिक्षण-२)